**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(६०)/का-१४११,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. १४ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२.
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी "महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" व "नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुनःस्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (महानगरपालिका)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. ५०.०० कोटी एवढ्या किमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका ही राहील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, सांगली यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, सांगली यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, सांगली

यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC कोड व खाते क्रमांक) नियोजन विभागास सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, सांगली / कार्यान्वयीन यंत्रणा सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तीचे पालन करणे बंधकारक राहील.

५. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन, (०१)(०१), नागरी स्थानिक संस्थांना (महानगरपालिका) सहायक अनुदान (३६०४ १००९) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातुन भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१९५१०३९११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.14 20:00:03 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग.
२. जिल्हाधिकारी, सांगली.
३. आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली.
४. जिल्हा नियोजन अधिकारी, सांगली.
५. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव.
६. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
७. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८. जिल्हा कोषागारे अधिकारी, सांगली.
९. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(६०)/का-१४११, दि.१४ मार्च, २०२४ सोबतचे परिशिष्ट, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका रु.५०.०० कोटी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **कामांचे नांव** | **रक्कम (रु.लाख)** |
| १ | सांगली वॉर्ड क्र.१७ क मधील रस्ते करणे, सांगली वॉर्ड क्र.१७ क मधील ओपन स्पेस विकसित करणे. सांगली वॉर्ड क्र.१७ क मध्ये ड्रेनेज लाईन टाकणे. | २५० |
| २ | सांगली वॉर्ड क्र.१७ क मधील सर्व्हे नं.७१/१,७१/२,७१/३ विकसित करणे, सांगली वॉर्ड क्र.१७ क मधील रस्ते करणे, सांगली वॉर्ड क्र.१७ क मधील सर्व्हे नं.१२४३८ विकसित करणे. | २५० |
| ३ | सांगली वॉर्ड क्र.८ क मधील रस्ते करणे, | १०० |
| ४ | मिरज वॉर्ड क्र.६ ड मधील रस्ते कॉंक्रिटीकरण करणे. (५० लक्ष), मिरज वॉर्ड क्र. ६ सौदागर गल्ली मध्ये सभामंडप सुधारणा करणे.(१० लक्ष), मिरज वॉर्ड क्र. ६ खाणापुरे पार्क परिसरातील रस्ते करणे. (३० लक्ष). मिरज वॉर्ड क्र.६ अ मधील मगदुम दुकान ते अनिल दुकान ते निपाणीकर दुकान रस्ता ट्रीमिक्स करणे.(५० लक्ष), मिरज वॉर्ड क्र. ६ मधील मनपा शाळा नं.१४ व मनपा शाळा नं. ४ समोर रस्ता करणे. (१० लक्ष) | १५० |
| ५ | मिरज वॉर्ड क्र.२० ब कृष्णा घाट परिसरात ड्रेनेज लाईन टाकणे व रस्ते करणे. (५० लक्ष), मिरज शहरातील महात्मा बसवेश्वर महाराज पुतळा परिसर सुशोभीकरण करणे.(५० लक्ष) | १०० |
| ६ | सांगली वॉर्ड क्र.१५ मधील स्विमिंग टँक परिसर विकसित करणे.सांगली वॉर्ड क्र. १५ मधील रस्ते व गटारी करणे. .(१०० लक्ष), सांगली शहरातील भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुतळा परिसर सुशोभीकरण करणे. (५० लक्ष) | १५० |
| ७ | सांगली शहरातील शामरावनगर मुस्लिम व ख्रिश्चन समाज दफनभूमी परिसरात कॉंक्रिटीकरण करणे. | १५० |
| ८ | सांगली शहरातील मुस्लिम कब्रस्थान विकसित करणे. | ५० |
| ९ | सांगली शहरातील डॉ.बाबासाहेब आंबेडकर पुतळा परिसर विकसित करणे. | १५० |
| १० | मिरज शहरातील महात्मा जोतिबा फुले उद्यान विकसित करणे. | ५० |
| ११ | सांगली शहरात मत्स्यालय व पक्षीसंग्रहालय विकसित करणे. | १६० |
| १२ | सांगली राजर्षि शाहू महाराज मार्ग चौक सुशोभीकरण करणे. | १०० |
| १३ | सांगली शहरातील काळी खण विकसित करणे. | १४० |
| १४ | सांगली शहरातील उद्याने विकसित करणे. | २०० |
| १५ | सांगली मिरज कुपवाड शहरात सी.सी.टी.व्ही. बसविणे. | २०० |
| १६ | सांगली मिरज कुपवाड शहरातील मुख्य रस्ते ट्रिमिक्स पद्धतीने करणे. | ५०० |
| १७ | अहिल्यादेवी होळकर स्मारक परिसर विकसित करणे. | १०० |

| | | |
|---|---|---|
| १८ | मल्हारराव होळकर चौक विकसित करणे. | ५० |
| १९ | सांगली शहरातील ऑक्सिडेशन पॉन्ड परिसर विकसित करणे. | १०० |
| २० | सांगली वॉर्ड क्र.१५ मधील रस्ते, गटारी व ओपन स्पेस विकसित करणे. | ३०० |
| २१ | महात्मा बसवेश्वर महाराज महयावर्ती निदान केंद्र विकसित करणे. | १०० |
| २२ | कुपवाड पाटबंधारे ऑफिस ते बालाजीनगर कुपवाड ला जाणारा १०० फूटी नवीन डीपी रोड विकसित करणे. | ४०० |
| २३ | सांगली वॉर्ड क्र.१८ मधील रस्ते व गटारी करणे. | १५० |
| २४ | कुपवाड शहरातील मुख्य रस्त्यावर दुभाजक बसविणे. | १५० |
| २५ | सांगली वॉर्ड क्र. १९ मधील रस्ते व गटारी करणे. | १०० |
| २६ | वार्ड क्र. ८ मधील हॉटेल आमंत्रण ते जिजामाता कॉलनी रस्ता डांबरीकरण करणे. | ३० |
| २७ | वार्ड क्र. ११ मधील रामरहीम कॉलनी अनवर मसजिद समोरील मनपा उद्यानास कपाऊंड वॉल करणे. | २० |
| २८ | वार्ड क्र. ८ मधील विशाल पाटील घर ते चिंतामणी पार्क कॉर्नर रस्त्याचे खडीकरण व डांबरीकरण करणे. | २० |
| २९ | वार्ड क्र. १ मधील कापसे प्लॉट ओपन स्पेसला कपांऊड वॉल, वॉकींग ट्रॅक इ. कामे करणे. | ६० |
| ३० | वार्ड क्र. १ मधील रेणुका मंदीर ते कापसे प्लॉट बुधगाव रस्ता आर.सी.सी. गटर करणे. | ३० |
| ३१ | वार्ड क्र. २ मधील महावीर व्यायाम शाळा ते सम्राट अशोक चौक रस्ता डांबरीकरण करणे, तसेच पुढील आर.सी.सी. गटर करणे. | ४० |
| ३२ | वार्ड क्र. २ मधील कजांरभाट स्मशानभूमी येथे कपांऊड वॉल, दहन शेड, निवारा शेड इ.करणे | ४० |
| ३३ | वार्ड क्र. २ मधील कोळेकर घर ते पेन्सिल कारखाना जी.पी.एम. कॉलेज समोरील रस्ता डांबरीकरण करणे. | ३० |
| ३४ | वार्ड क्र. २ मधील जी.पी.एम. कॉलेज शेजारी सह्याद्री नगर अंतर्गत रस्ते कॉंक्रीटीकरण करणे. | ५० |
| ३५ | वार्ड क्र. १ मधील शिवनेरी नगर मधील मनपा ओपन स्पेस जकाईदेवी येथे कपांऊड वॉल , पेव्हिंग ब्लॉक , शेड इ.करणे. | ३० |
| ३६ | कुपवाड शहरातील स. नं. १७९ ( जुना ४५९/२अ/ब) मध्ये नियोजित दवाखाना इमारत विकसित करणे. | ५०० |
| | **एकुण** | **५०००** |

*****